**जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२१/१८४/प्र.क्र.६८/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ सप्टेंबर, २०२१

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि. १/८/२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८/३/२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,दि. १७/४/२०१५
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१७/४२५/प्र.क्र.१०५/र-८, दि.१९/१०/२०१८
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.अर्थसं-२०२१/१२७/प्र.क्र.४४/र-८, दि.०६/११/२०२०
६) कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांचे पत्र क्र.मुपावि/लेखा/१६९४/ सन २०२१, दि.१९.०५.२०२१

**प्रस्तावना-**

जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र.४ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यापैकी काही नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र.५ येथील आदेशान्वये निधी वितरित करण्यात आला आहे. आता कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी संदर्भाधिन क्र.६ येथील पत्रान्वये जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील प्रगतीपथावरील कामांकरिता निधी मागणी प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने, निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय-**

२. त्यानुसार, जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावांमधीलप्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी एकूण रु.५,७०,९७,७८०/- एवढा निधी सन २०२१-२०२२ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**३. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, जायकवाडी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील नेवासा तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील प्रगतीपथावरील खाली नमूद नागरी सुविधा**

कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षातBEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु. ५,७०,९७,७८०/- (अक्षरी पाच कोटी सत्तर लक्ष सत्त्याण्णव हजार सातशे ऐंशी फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)(कार्यक्रमावरील खर्च) " या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून विभागीय आयुक्त, नाशिक यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे :-

| अक्र | पुनर्वसित गावाचे नांव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरीत निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | तरवडी | तरवडी ते अंतरवली रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र.०/०० ते ३/०० | ३५,९८,००० |
| २. | रामडोह | स्मशानभूमी पोहोच रस्ता खडीकरण करणे सा.क्र.०/० ते २/०० | २५,००,००० |
| ३. | वरखेड | गावठाण ते पाणीपुरवठा विहीर अंतर्गत रस्ता खडीकरण करणे सा.क्र.०/० ते २/०० | ३०,००,००० |
| ४. | प्रवरासंगम | प्रवरासंगम ते कोरडेवस्ती रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र.०/० ते २/२०० | ७४,६८,४२० |
| ५. | सुरेगाव दही | स्मशानभूमी पोचरस्ता खडीकरण सा.क्र.०/०० ते २/०० | ३३,००,००० |
| ६. | गळनिंब | गळनिंब स्मशानभूमी पोहोच रस्ता खडीकरण करणे सा.क्र.०/०० ते १/५०० | ३०,००,००० |
| ७. | सुरेगाव गंगा | सुरेगांव ते बेलपिंपळगांव रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र.१/५०० ते ३/६०० | ६७,९४,४०४ |
| ८. | प्रवरा संगम | प्रवरासंगम ते स्मशानभूमी रस्ता खडीकरण सा.क्र.०/०० ते ०/५०० | २,४३,००० |
| ९. | माळेवाडी खालसा | माळेवाडी खालसा ते स्मशानभूमी रस्ता खडीकरण सा.क्र.०/०० ते ०/५०० | ३,७०,००० |
| १०. | बेलपांढरी | बेलपांढरी ते बेलपिंपळगांव रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे सा.क्र.०/०० ते २/५०० | ६८,३९,९५६ |
| ११. | गोधेगांव | स्मशानभूमी पोचरस्ता खडीकरण करणे सा.क्र.०/०० ते ०/९०० | ७,५१,००० |
| १२. | भालगांव | स्मशानभूमी पोहोचरस्ता खडीकरण करणे सा.क्र.०/०० ते १/५०० | ९,९८,००० |
| १३. | जैनपूर | जुने जैनपूर ते बेलपिंपळगांव रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे सा.क्र.०/०० ते ३/००० | ९१,६९,००० |
| १४. | बोरगांव | बोरगांव ते बोरगांव चौफुला रस्ता खडीकरण व डांबरीकरण सा.क्र.०/०० ते २/५०० | ९०,६६,००० |
| | | **एकूण -** | **५,७०,९७,७८०** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, नाशिकयांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षकअभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMSद्वारे तात्काळ वितरित करावा.

२)अधीक्षकअभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांनी नागरी सुविधा व तद्नुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीयआयुक्त,नाशिक यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकतानाही.

४) कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, नाशिक तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

**११)** संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र UtilisationCertificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

**१२)** यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०८१२५४५२६०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chularam R Nikhare

Digitally signed by Chularam R Nikhare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, cn=Chularam R Nikhare
Date: 2021.09.08 14:45:54 +05'30'

**( चु. रा. निखारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणे विभाग, नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अहमदनगर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
५. अधीक्षकअभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक
६. कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग, अहमदनगर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
८. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
१०. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
११. वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१२. नियोजन विभाग,कार्यासन १४७५,मंत्रालय,मुंबई ३२.
१३. महसूल व वन विभाग,कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१४. महसूल व वन विभाग ,पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय,मुंबई ३२.
१५. निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

*****